हिंजवडी पोलीस ठाणे, गुन्हा नोंद क्र. ८७/२०१० मधून उद्‌भवलेल्या आणि सत्र न्यायालय, पुणे येथे दाखल प्रकरण क्र. ४८९/२०१० मध्ये शासनातर्फे विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्त करण्यात आलेल्या ॲड. श्री. उज्वल निकम यांना व्यावसायिक फी मंजूर करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्र. एसपीपी २०१०/१३५१ /प्र.क्र.२८०/पोल-१०
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२ दिनांक : १ ऑगस्ट, २०११.

संदर्भ :- शासन अधिसूचना, विधी व न्याय विभाग क्र. एसपीपी २०११/ए.एस.१०/ डी चौदा, दिनांक १७.२.२०११

<u>शासन निर्णय</u> :- पुणे हिंजवडी येथे दि. १.४.२०१० रोजी एका महिलेवर झालेल्या बलात्कार प्रकरणी हिंजवडी पोलीस ठाणे, गुन्हा नोंद क्र. ८७/२०१० मधून उद्‌भवलेल्या आणि सत्र न्यायालय, पुणे येथे दाखल प्रकरण क्र. ४८९/२०१० मध्ये शासनाच्या वतीने कामकाज पाहण्यासाठी ॲड. श्री.उज्वल निकम यांची विधी व न्याय विभागाच्या वरील संदर्भाधीन दिनांक १७.२.२०११ च्या अधिसूचनेन्वये विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्ती करण्यात आलेली आहे. सबब, प्रस्तुत प्रकरणी काम पाहण्यासाठी त्यांना खालीलप्रमाणे फी मंजूर करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| अ) प्रतिदिन परिणामकारक सुनावणी फी | - | रु. २०,०००/- |
| ब) विचार विनिमय फी (प्रतितास)<br>( कमाल मर्यादा प्रतिदिन रु. २०,०००/-) | - | रु. ५,०००/- |
| क) हॉटेल लॉजिंग प्रतिदिनी | - | रु. ३,५००/- |

२. परिणामकारक सुनावणीचे दिवस व विचार विनिमयाचे तास संबंधीत प्रकरणाच्या पर्यवेक्षकीय पोलीस उपायुक्त दर्जाहून कमी नाही, अशा अधिका-यांकडून प्रमाणित करून घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान होणार नाही, याची दक्षता घ्यावी. तसेच, अपरिणामकारक सुनावणी फी अनुज्ञेय नाही.

३. याबाबतचा खर्च मागणी क्र.मागणी क्र. बी-१, २०५५ पोलीस - (००) १०९, जिल्हा पोलीस (००) (०१) जिल्हा पोलीस दल - (२०५५ ०१६८) - २८ व्यावसायिक व विशेष सेवा या लेखाशिर्षाखालील त्या त्या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात येईल.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. सीआर- ४२०/११/व्यय-७, दिनांक १६.७.२०११ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय राज्य शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०११०८०१११४५१४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( वि. वि. दपके )
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रति,

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई .
पोलीस आयुक्त, पुणे.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) महाराष्ट्र १ / २, मुंबई / नागपूर.
जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
वित्त विभाग (व्यय- ७), मंत्रालय, मुंबई.
ॲड.श्री. उज्वल निकम, ४८ रामदास कॉलनी , बॅरिस्टर निकम चौक, जळगाव.
निवड नस्ती (पोल-१०)